**उप विभागीय अभियंता (स्थापत्य) यांच्या बदलीने नियुक्ती/ पदस्थापनेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांक: बदली-२०२३/प्र.क्र.२४५/सेवा-२**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२.**
**दिनांक:- १६ मार्च,२०२४.**

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने सार्वजनिक बांधकाम विभागातील उप विभागीय अभियंता (स्थापत्य) संवर्गातील अभियंत्यांची त्यांच्या विनंतीनुसार खाली दर्शविल्याप्रमाणे बदलीने नियुक्ती/पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र | अभियंत्यांचे नाव व पदनाम | सध्या कार्यरत असलेले ठिकाण | बदलीने नियुक्तीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री. सुधीर काशिनाथ मढवी, उप विभागीय अभियंता | उप अभियंता, सहायक अधीक्षक अभियंता, सा. बां. (आदि.) मंडळ, नागपूर. | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्र. २, पनवेल, जि. रायगड या रिक्त पदावर. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी. (विनंतीनुसार) |
| २. | श्री. विनोद दामोदर दिवटे, उप विभागीय अभियंता | उप अभियंता, मार्ग प्रकल्प उप विभाग क्र. ४, कणकवली. | उप अभियंता, जिल्हा परिषद (बांधकाम) उप विभाग, धानोरा, जि. गडचिरोली या रिक्त पदावर | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी. (विनंतीनुसार) |
| ३. | श्री. संजय रमेशचंद्रजी लड्ढा, उप विभागीय अभियंता | उप अभियंता, रो. ह. यो.(सा. बां.) उप विभाग, बार्शी, जि. सोलापूर | मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभागीय कार्यालय, नागपूर येथील उप अभियंता या रिक्त पदावर | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी. (विनंतीनुसार) |

**२.** संबंधित वरिष्ठ अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, सदर नियुक्ती/पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यांस आपल्या नवीन नियुक्तीच्या जागी तात्काळ हजर करून घ्यावे. तसेच, संबंधीत अभियंत्यांस कोणत्या दिनांकास कार्यमुक्त करण्यात आले व नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doser2.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडी त्वरित कळवावे.

**३.** वरील अभियंत्यांची विनंतीनुसार बदली असल्याने, त्यांना प्रवास भत्ता व पदग्रहण अवधी अनुज्ञेय राहणार नाही.

**४.** संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, सदर आदेशान्वये बदलीने पदस्थापना करण्यात आलेल्या ज्या उप अभियंत्यांना सार्वत्रिक निवडणूक-२०२४ करीता कर्तव्यार्थ नियुक्ती करण्यात आली आहे. त्यांच्या बाबतीत निवडणूक कर्तव्यात बाधा येणार नाही याची दक्षता संबंधित उप अभियंता व नियंत्रण अधिकाऱ्यांने घ्यावी.

**५.** संबंधीत अभियंत्यांना शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच, म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधीत अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जांची दखल घेण्यात येणार नाही.

**६.** सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

**७.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१६१३४९५९६३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DATTATRAY VASANTRAO KHARKE

Digitally signed by DATTATRAY VASANTRAO KHARKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff05921827123426ec3977a7476478ce183be979d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6BAEF55AD6F77A3A40CCCC3E9DD0F50E344AB83A754542299875CF07868ED88B, cn=DATTATRAY VASANTRAO KHARKE
Date: 2024.03.16 13:59:15 +05'30'

**(द.व.खारके)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
२. खाजगी सचिव, मा. मंत्री (सा.बां.), मंत्रालय, मुंबई.
३. अ.मु.स.(सा.बां.वि.)/सचिव(रस्ते)/सचिव(बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सा.बां.वि.मंत्रालय, मुंबई.
४. मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण/पुणे/ नागपूर.
५. सर्व संबंधीत अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ.
६. सर्व संबंधीत कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग.
७. संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
८. संबंधीत अधिकारी (ई-मेल द्वारे).
९. कार्यासन सेवा-२, संग्रहार्थ.